बेला, तुझा पराक्रम काय तो बायकांतच तेवढा. माझ्यासारख्या समोर तुझें कांहीं एक चालणार नाहीं. चलहो मुकाट्यानें चालता येथून.

**विक्रम**–(त्वेषानें जमिनीवर तरवार आपटून) अरे चल. तुझ्या बोलण्यावरूनच तुझ्या अंगांत किती पराक्रम आहे तो मला आतां पुरतेपणीं समजला.

**वज्रशील**–[ मनांत ] अहाहा ! मला उद्धरून स्वर्गास जाण्याची ही संधी फार चांगली आहे व अनायासें प्रसंगही तसा आला आहे; तरी आपलें ह्याचवेळेस कार्य उरकून घ्यावें ह्मणजे बरें पडेल. विना अपराध केल्याशिवाय हा परमेश्वररूपी **विक्रम** माझ्या आंगावर सहसा हस्त टाकणार नाहीं, करितां आपणच ह्याची कांहीं खोडी करावी ह्मणजे सहज हा मांझा वध करील ह्यांत संशय नाहीं. [ हस्ताचेठायीं कांहीं पाषाण धारण करून उघडपणें ] हं ! चल पोर्‍या. पहा आतां माझा पराक्रम कसा आहे तो! [ त्याच्या अंगावर तेवढे पाषाण फेंकून देतो व पिंजर्‍यास लात मारून तो पलीकडे फेंकून देतो त्या योगें ती सकुमार अबला मूर्छित होऊन पिंजर्‍या बाहेर येऊन पडते तों **विक्रम** झुगारलेल्या पाषाणांचें निवारण करून तोच पिंजरा त्या निशाचराच्या मस्तकीं घालतो. ]

**विक्रम**–कां षंढा, पाहिलासना ह्या **विक्रमाचा** कसा पराक्रम आहे तो! आतां जास्त बडबड न करितां हें सरशेवटचें प्रायश्चित घे एकदाचें [ असें म्हणून राक्षसास एका प्रचंड बाणेंकरून खिळखिळें करतो ].

**वज्रशीळ**–[ हातघाईस येऊन ] शाबास वीरा शाबास,
आतां माझाही पराक्रम एकदां अवलोकन करावास.

पंचचामर.

**वृक्ष वक्षवज्र जाहिं खड्ग घेउनी त्वरें ॥**
**मारि विक्रमासिं दुष्ट, तोंहि घेइ सत्वरें ॥**
**सूड त्याच, राक्षसासि मारि भूप तो असी ॥**
**बालसिंह दंति यास मर्दि, काय मौजसी ॥**

( हळ हळ करीत राक्षस भूतलाप्रत पतन पावतो व त्याचे म्हणण्यावरून **विक्रम** त्यानें सांगितलेली गुप्त गोष्ट ध्यानांत ठेवितो. राक्षसानें ईश्वर स्मरण करीत प्राण सोडला म्हणून तो दिव्यदेहाप्रत पावून स्वर्गधामाप्रत जाता झाला.)

**विक्रम**–( स्त्रीजवळ येऊन ) शिव शिव ! काय ह्या स्त्रीची दुःखावस्था ! परमेश्वरा, अशा अबलांवर तूं किमर्थ प्रसंग आणतोस ? दुष्ट राक्षसाने पिंजऱ्यास लात मारली तेव्हां इच्या जिवास किती क्लेश झाले असतील? [ तिच्याकडे पाहून ] हे स्त्रिये, सावध हो; ज्या निशाचराच्या भयेंकरून तूं ह्या भयंकर स्थितीस पोंह्चलीस, ईश्वरकृपेकरून त्या दुष्टाचा निःपात केला. आतां सावध हो आणि चल आपल स्वधामास [सरोवरांतलें थंड पाणी तिच्या अंगावर शि डतो ] हे अबले, प्रत्यक्ष **विक्रम** तुला एकसारखा बा-

१ वज्र प्रमाणें ज्याचें वक्षस्थळ. २ विक्रम. ३ तरवार.

हीत असतांही तुला, मला यश देण्याची दया येत नाहीं काय? शिव शिव!

स्त्री–(सावध होऊन त्यास नमस्कार करते) धन्य होय पुरुषा, धन्य होय तुझी. परमेश्वर तुझें कल्याण करो. कृपाकरून आतां मला माझ्या पतीजवळ पोंहचतें करून दे.

विक्रम–बाई, प्रथमतः माझ्या येथें चला, म्हणजे सर्व तजवीज करण्यांत येईल. मनामध्यें चलण्यास आतां किंतु बिलकुल आणूं नका. आपण केवळ माझ्या भागिनीप्रमाणें आहां.

स्त्री–बरं, बाबा! चला तर.

[ उभयतां गमन करतात. ]

( पडदा पडतो. )

**प्रवेश ३ रा समाप्त.**

---



## प्रवेश ४ था.

---

### स्थळ–देवनगरीमधें कामकंदलेचा महाल.

पात्रें.

कामकंदला..................वेश्या.
गिरजा.....................तिची दासी.
राजवैद्य.......... .........विक्रम.
विदूषक.......................सूत्रधाराचा मित्र.

गिरजा–(दुःखानें) काय बाई करूं! राजवैद्यास जाऊन तर पुष्कळ दिवस झाले, कां येणं अझून होत नाहीं कोण जाणे. [प्रेताकडे पाहून] मला, इकड पाहिलं तर आतां खरोखर भीति वाटते. भिऊन तरी उपयोग काय? केव्हां राजवैद्य येणार? आणि केव्हां हें प्रेत उठणार? कदाचित मेला स्त्रीलंपट **कामसेन** आला तर इच्यासह मला उभ्या तेलानं न्हाववून जाळून टाकील. आतां जर ह्या प्रेतास जाळूं नये तर तिकडून पंचाईत व जाळूं म्हटलं तरी पंचाईत. काय करूं बाई. इकडच्या आडांत उडी टाकूं कां तिकडच्या विहिरींत, करूं तरी काय? वैद्य येण्याची तर आतां आशाच राहिली नाहीं. प्रेतास आतां दहन करावें हेंच योग्य. (आसूं पडतात) बाईसाहेब, आज एक सारखा आठ दिवस आपण माझ्याशीं किमर्थ अबोला

धरिला? मी असा आपला अन्याय तरी काय केला? आपल्या पाठीमागें आतां ही गिरजा उघडी पडली तिला आतां कोण झांकण घालणार आहे? शिव शिव, परमेश्वरा! बाईसाहेबांस आतां अग्नी देऊन, आत्महत्या करून मीहि तुझ्या चरणकमलांजवळ भ्रमरिणी प्रमाणें सदासार्वकाळ एकाग्रचित्तेंकरून वास करीन.

विदूषक–[ घाई घाईनें ] ए गिरजा, त्या दिवशीं आलेला रामोशी पुन्हः तुझ्या घरावर दरोडा घालण्याकरितां एकटाच आला आहे. लौकर ह्याची तजवीज कर नाहीं तर माझा दोन कवड्यांचा वाटेंत एका संभाविताचा चोरलेला जोडा चोरून नेईल. चल, उठ लौकर.

गिरजा–( सखेदानंदानें ) काय? राजवैद्य आले म्हणतोस; चल, कुठें आहेत, दाखिव मला ते. [ त्यास आंत घेऊन येतो ] वैद्यराज, नमस्कार करतें.

विदूषक–घटकाभर खुंटीवर टांगून ठेव.

राजवैद्य–कल्याण होवो. गिरजा, बोलल्याप्रमाणें मी प्रयत्न करून ही अमृतवल्ली आणली. परंतु काळ फिरला ह्मणजे नाहीं नाहीं तीं संकटें प्राप्त होतात, हें खरें. वाटेनें जातां जातां, गिरजे, मला जीं जीं संकटें प्राप्त झालीं, तीं माझीं मीच जाणें. असो, परमेश्वरानें तशांतून पार पाडून मला निर्विघ्नपणे पोंचविलें हेंच मोठें भाग्य समजलें पाहिजे.

गिरजा–तें सर्व खरें, परंतु बोलल्याप्रमाणें बाईसाहेबांस उठवा ह्मणजे जितली गोष्ट.

राजवैद्य–( अमृतवल्ली हातांत घेऊन ) कुठें आहे त्या कामकंदलेचें प्रेत? [ मंचकासमीप जाऊन ] अहाहा; ह्या अबलेचें ह्या वेळेस भयंकर स्वरूप दिसतें! अंगास अगदीं कृशता प्राप्त झाली आहे. नेत्र निस्तेज होऊन गालही सुकून गेले आहेत! केंस चहूंकडे पिंजारले असून, कशी अस्ताव्यस्त पडली आहे; शिव शिव! ह्याचें नांव प्रीतिः अस्तु. [ तोंडास अमृतवल्ली लावतो ].

कामकंदला–( जीव येऊन ) हर हर, प्राणनाथ, आपला शोध करण्याकरितां मी आतां स्वर्गास पोंचणार तों दुष्टानं पुनः ह्या मृत्युलोकीं ढकललं काय? खरोखर मी पापी ह्मणून आपलं चरणकमल ह्या भ्रमरीस दृष्टीगोचर झालं नाहीं. [ उसासा टाकून ] शिव शिव हे प्राणनाथ! [पुनः निचेष्टित पडते.]

गिरजा–(आनंदानें) बाईसाहेब, आपली प्रिय दासी, माधवांचा शोध लावून त्यांनां भेटण्याकरितां तुह्मांस उठवीत असतां आपणांस ऐकूं येत नाहीं काय? उठा, सावध व्हा, आणि माधवांस एकदां कडकडून आलिंगन द्या. (तिच्या नेत्रांस गुलाबपाणी लाविते.)

कामकंदला–[ एकदम उठून ] सखे, हें अमृतासारखं जें बोललीस तें तूंच का! अहाहा! कुठं ती सकुमार मूर्ती! मी तुझ्या पायां पडतें; मला तो मनोहर पुतळा दाखवून एकदां प्रेमानें कडकडून भेटूं दे.

गिरजा–सरकार, जरा सावध होऊन स्थीर व्हा. असे वेडे

चार दुसऱ्यांसमोर करावितना? आपल्या समाचारास मागें आलेले राजवैद्य माधवाकडून पुन्हा आले आहेत.

कामकंदला–[आनंदानें] काय म्हटलंस? वैद्य महाराज आलेत काय? [उभी राहून] धन्वंतरी राज, नमस्कार करतें.

राजवैद्य–( हर्षित मुद्रेनें ) अहाहा, सकुमारे, ईश्वर तुझें कल्याण करो. कामकंदले, मी कोण आहें, हें तुला माहीत आहे काय?

दोघी–( हात जोडून ) आम्हास काय ठाऊक? मेहरबानी करून आपण नांव गांव वगैरे कळविल्यास आम्ही आपले मोठे आभारी होऊं.

राजवैद्य–( गांहिवरून )

शार्दुल विक्रीडित.

मेले सांगुन प्राणनाथ तुजला केलें इथें प्रेतसें ॥
तैसेंही करुनी तुझ्या प्रतिस गे, गेलों वनीं मी जसें ॥
वेताळा करुनी प्रसन्न, तुजला, आणी तसें माधवा ॥
घालूनी पुनरपिजिवास, सुगुणें, ऐके सुते, येथवां ॥ १ ॥

दिंडी.

वैद्य तोची, भूपती अवंतीचा ॥
मला विक्रम बोलती सत्यवाचा ॥
मीच वेषा घेउनी पाहु आलों ॥
परी प्रीती तुमची धन्य झालों! ॥ २ ॥

हे सुंदरी, त्वां मनोभावानें वरलेला पती माधव सांप्रत

ममगृहीं वास करीत असून तुझ्या प्राप्तीविषयीं मला रोज विनंती करीत असे. माझ्या मनांत तुम्हां उभयतांची भेट करणें होतेंच, परंतु प्रथमतः ह्या उभयतांचें प्रीतिपरीक्षण करावें आणि जर तुह्मां दोघांचें एकमेकांवर विलक्षण प्रेम असेल तर, त्या दुष्ट **कामसेना**ची खोड मोडून **माधवास** तुझ्यासह येथेंच राज्यावर बसवून आनंदसागरांत बुडवावें, असें मनांत आल्याबरोबर कोणासही तेथें न पुसतां गुप्तपणें वैद्यवेष घेऊन येथें प्राप्त झालें; आणि तुझें प्रेम **माधवावर** कसें आहे, हें पहाण्याकरितां मी '**माधव** तुझ्या विरहानें मरण पावला' असें लटकेंच सांगितलें. तों तुझें प्रेम त्यावर अनिवार, म्हणूनच त्याच्या नावाचा हट्ट घेऊन त्वां प्राणोत्क्रमण केलेंस; यांत संशय नाहीं. व त्यावेळेस माझ्या मनाची जी काय अवस्था झाली ती माझी मीच जाणें. असो, आतां कांहीं होवो '**माधवा**सही ही मरणाची दुर्वार्ता सांगावी' असा विचार करून येथून मी तावडतोब पाय काढला आणि **अवंतीस** जाऊन त्यास बरोबर रात्रींच्या बारा वाजतां तुझी मृत्युवार्ता पत्रद्वारें सूचविली. वाह्वा! काय त्याचें प्रेम तुझ्यावर विलक्षण! पत्र वाचून जेंव्हां धाय धाय रडण्यास आरंभ केला तेंव्हां मला तर काय? परंतु रात्रीस भ्रमण करणाऱ्या पशुपक्ष्यांसही त्याचा दीनवाणा शोक ऐकून रडूं आलें. ह्याप्रमाणें तो शोकसागरांत बुडतां बुडतां त्यास एकदम मूर्छा प्राप्त झाली! (हें वर्तमान ऐकून दोघींच्या, विशेषेंकरून

कामकंदलेच्या नेत्रांतून एकसारखा जलप्रवाह चालूं लागतो ) कामकंदले, आतां रडण्याचें कांहीं कारण नाहीं. परमेश्वरानें तुमचे सुखाचे दिवस जवळच आणले आहेत. असो. जशी त्यांस मूर्छा प्राप्त झाली तसा मी जवळ जाऊन त्याच्या नाड्या पाहिल्या तों शारीरिक सर्व रहाटगाडगें बंद झालेंसें समजलें. स्त्रियांनो, त्या वेळेस मला अतोनात वाईट वाटून आतां एकदम अग्निप्रवेश करावा असें वाटलें. तसाच मी त्या भयंकर रात्रीं अरण्यप्रवेश करून मोठें थोरलें अग्निकुंड रचिलें. वैश्वानर ज्या वेळेस प्रज्वलित झाला त्या वेळेस म्यां त्यास नमन करून शरीराची आतां प्रवीरजामातास आहुती द्यावी असें ह्मणून जों आंत उडी टाकावी तों ममसाह्यकारी दयाळू वेताळ महाराजांनीं वरचेवर उचलून धरिलें. हे माधवाभिरमणे, त्यांनीं मी मागितल्यावरून ही अमृतवल्ली देऊन सांगितलें कीं, इच्या स्पर्शानें केवळ तेंच दोघेजण पुनरुज्जिवनास पात्र होतील. तदनंतर मी अवंतीस जाऊन पहिल्यानेंच ही मुळी त्याच्या मुखास लावतांच त्यास स्वभावस्थेप्रमाणें झालें. नंतर मी त्यास, जसें तुजजवळ खोटें बोललों, तसें त्या जवळही 'कामकंदला जीवंत आहे' ह्मणून सांगितलें. ज्या वेळेस मला ही अमृतवल्ली प्राप्त होऊन अवंतीस जाण्यास निघालों तों वेताळ महाराजाच्या कृपेंकरून वाटेंत वज्रशील नावाच्या राक्षसाचा वध करून तुझ्या पतीची पट्टराणी 'शृंगारवल्लरी' हीची त्या दुष्टाच्या तडाक्यांतून सुटका

करून माधवांस तिला भेटाविलें, तों दुसरीही विवाहीत स्त्री 'चंपकमालती' नांवाची हंसत हंसतच तेथें प्राप्त झाली. आतां इचा आणि माधवाचा विवाह कसा झाला व ती कोणाची कन्या, हें मला तुझ्या काळजींत असल्यामुळें बरोबर समजलें नाहीं, तरी ती एथील प्रधानकन्या आहे असें उडत उडत समजलें आहे. असो. गिरजे, ह्या वरच्या भानगडीमुळें 'कामकंदलेस' पुन्हां सजीव करण्याकरितां इतका विलंब लागला. एकूण तुह्मां उभयतांची एकमेकांवर प्रीति फारच आहे हें आतां स्पष्टपणें माझ्या लक्षांत आलें. चिंता नाहीं, आतां मी अवंतीस जाऊन उद्यां किंवा परवां एका जासुदाकरवीं ह्या कामसेनास तुझ्याबद्दल आणि कांहीं राज्यप्रकर्णाबद्दल लिहून पाठवीन. सदहू प्रमाणें त्यानें ऐकलें तर बरेंच आहे. नाहीं तर पुढें होणारें तुला ठाऊक आहे. असो, आतां मी जातों. [ वैद्यवेषाचा त्याग करून पूर्व स्वरूप धारण करितो ]

श्लोक.

( भुजंगप्रयात )

शिरीं मुगुटांची दिसे भव्य कांती ॥
मुखीं भास्करांची[1] दिसे पूर्ण दीप्ती[2] ॥
गळीं हार, अंगीं बहुमोल्य वस्त्र ॥
करी खड्ग चापादिकीं फार शस्त्र ॥१॥

[ अशा त्यां विक्रमांस पाहतांच दोघींनीं त्यास प्रणि-

१ सूर्याची. २ प्रभा, तेज.

पात केला व माझ्याकरितां **विक्रमास** फार कष्ट पडले ह्मणून **कामकंदलेस** वाईट वाटलें ह्यामुळें ती सद्‌गदित होऊन म्हणते ]

**कामकंदला**–अहाहा ! धन्य होय **विक्रमा** आपली! ईश्वर तुमचें कल्याण करील.

[ विक्रम निघून जातो. ]

**गिरजा**–[ आनंदानें ] बाईसाहेब. एकूण आपणास दोघी सवती आहेत तर. परंतु कांहो! मला मोठं नवल वाटतं कीं, ( नेत्रांतून अश्रू पतन होतात ) माझ्या प्रिय **वसंतीस** व प्रधानकन्या **चंपकमालतीस कामसेनानं** मारेकऱ्यांकडून मारवून त्यांच्या शिरकमळांसह **रतिप्रियेस** अग्नी दिला. असें असतां **चंपकमालतीचा** व आपल्या पतीराजांचा कसा विवाह झाला! व माझ्या **वसंतीची** काय वाट झाली असेल. असो, ईश्वराची कर्णी अगाध आहे. (उसासा टाकते )

**कामकंदला**–( तिला पोटाशीं धरून ] **गिरजा**, उगी. असं काय करतेस. ज्या ईश्वरानं **चंपकमालतीस** वाचविलं त्यानं का **वसंतीसही** नसेल वाचविलं काय ? अग, त्याच्या लीलेचा अन्त कोणी घेतला आहे? ईश्वरकृपेनें तुझी तिची. लौकरच गांठ पडेल. कांहीं काळजी करूं नको. ( **चंपकमालती** आपली सवत झाली व ती आपली पहिली मैत्रीणच आहे, आतां ईश्वरकृपेनें तिचा माझा चांगलाच संवाद होईल असें वाटून तिला फार सुख व आश्चर्यही वाटलें.]

**गिरजा**–सरकार, इतके दिवस आपल्या पोटांत अन्न न

पाणी, व सध्या बोलायचीही शक्ती नाहीं करितां भोजनास चलावं, सर्व तयारी आहे.

कामकंदला–( आनंदानें ) बरं आहे, चला तर ऊठा लौकर

( दोघी जातात. )

[ पडदा पडतो. ]

**प्रवेश ४ था समाप्त.**

---



## प्रवेश ५ वा

---

स्थळ—सुवर्णवसंतबाग.

पात्रें.

कामसेन ……राजा.
सुचार ………दूत.

[ तदनंतर खिन्नमुद्रेनें कामसेन सुवर्णवसंत बागेचे ठायीं प्रवेश करितो आणि मागें वर्णन केलेल्या कारंज्याजवळ संध्याकाळचे समयास एकटाच बसतो व सदहू मागें लिहिल्याप्रमाणें अवलोकन करतांच आपले मनांत उसासा टाकून म्हणतो. ]

गीति

यौवन स्त्री हो त्यजितां यौवन पुरुषाशीं नाहिं मग सूख॥
पात्रें विलास याचीं, पाहुन तरुणांस वाटतें दुःख ॥१॥

आणखीं

शिखरिणी

गमे कांते, मातें, तुजविण अतां काळ मजला॥
युगावाणी आतां, कमलनयने, सांग मजला॥
त्रिवार्हीं वेदीं तूं चढलिस अनंदें जंपुनियां॥
कसें तें तूं आजीं गमन करिलें गे त्यजुनियां॥ १ ॥

---

१ बोहल्यावर.

तुला वाटे भीती गमन करण्या एकाटिला ॥
कसें कांते आतां गमन करिलें सोडुन मला ॥
तुला नाये निद्रा मजविण प्रिये, गादिवरती ॥
कशी ती तूं भार्ये, निजलिस सुखें ताटिवरती ॥ २ ॥
तुला स्पर्शी नेत्रीं दरशन कधीं नाहिं सुशिले ॥
तया दुष्टाग्नीने पळभरिं तुला भस्म करिलें ॥
कसें कंठूं काळा तुजविण अतां सांग सगुणे ॥
दयानिधी देवा बघ मजकडे फार करुणें ॥ ३ ॥
तुझे गालीं वाटे रस भरुनियां अमृतवते ॥
तयां चुंबीतां गे जणु मजप्रिये स्वर्गच दिसे ॥
तसें वक्षीं दोन्ही कुचमरादितां काय मजला ॥
अलींगीतां, मातें, हरुष कितिगे होइ तुजला ॥ ४ ॥

[ चंद्राकडे पाहून ]

अरे दुष्टा चंद्रा प्रिय रतिप्रियेशीं वधुनियां ॥
नियेच्या कांतीतें हरण करुनी आज सखया ॥
प्रकाशूनी कांती पळसि अधमा सांग मजला ॥
कशी लज्जा नाहीं गमत सखया कांहिं तुजला ॥ ५ ॥

(असें ह्मणत ह्मणत जों बागेत चंद्राकडे वक्रदृष्टीनें पहात हिंडत आहे तों एकदम डचकून म्हणतो) कोण आहेरे येथें? अरे नीचा, तूंरे ह्या बागेंत माझ्या हुकुमावाचून कसा रिघाव केलास? अधमा, चल, कर येथून काळें. नाहीं तर ह्या शस्त्रायेंकरून तुला मी

1 सरणावर

आपल्या सखीचा जासूद करून पाठवीन. समजलास? आल्या वाटेनें मुकाट्यानें जा.

**सुचार**–(हात जोडून) सरकार, आप ऐसा घुस्सा न हुयिए. राजाधिराज **विक्रमनें** मुझे आपको एक चिठ्ठी देनेंके वास्ते भेजदिया है. [ पत्र हातांत देऊन ] ये लीजिये आप चिठ्ठी, और उसका जवाब भी पिछे चाहिये. मैं उनका सांडनिसिवार होके मेरा नाम **सुचार** है.

**कामसेन**–[ शुद्धीवर येऊन पत्र फोडतो आणि वाचण्यास आरंभ करितो. ]

॥ श्री ॥

" स्वस्तिश्री. सर्वगुणसंपन्न **कामसेन** मांडलीक राजे यांस
" राजाधिराज माल्वेंद्र **विक्रमार्क** राजे यांजकडून–
" प्रतीवर्षाप्रमाणें आपणांकडून दोनवर्षांची खंडणी
" आम्हांस अद्याप मिळाली नाहीं; ह्याचें कारण राज्य
" प्रकर्णीं आपलें दुर्लक्ष आहेसें वाटतें. दुसरें आपले
" शहरांत '**कामकंदला**' नामें एक अत्युत्तम गाणारी
" वेश्या आहे तीही आपण खंडणी बरोबरच पाठवून
" देणें. आपण वर लिहिलेल्या गोष्टी कबूल के-
" ल्यास बरें; नाहीं तर युद्धास सिद्ध व्हावें. पाठवि-
" लेल्या मनुष्याबरोबर उत्तर आलें पाहिजे, ही विनंती."

**विक्रम** आणि त्याचे मंत्री.

(त्वेषाने) **सुचारा**, **विक्रम** व त्याचे मंत्री यांस त्वां हेंच सांग कीं, **कामसेन** युद्धास सिद्ध आहे व **कामकंदला** जरी जिवंत झाली होती तरी तिला मी दासीसह पुनश्च पृथ्वींतून नाहींशी केली आहे! करितां तीही

आपणांस प्राप्त होणें नाहीं. सुचारा, याहीपेक्षां तुला सांगणें असल्यास खुशाल तेल मीठ लावून सांग. चल जा. हें घे त्या पत्राचें उत्तर. [ असें ह्मणून त्याच पत्रावर कांहींसें लिहून त्याच्या अंगावर टाकतो आणि सुचार निघून जातो. नंतर कामसेन पुन्हां पूर्वस्थलावर येऊन मनांत म्हणतो. ] हेंही एक प्रकारानें बरेंच झालें म्हणायचें. जरी मी यःकिश्चित राजा आहें तरी ईश्वर कृपेंकरून विक्रमाची खोड काढण्यापुर्ती माझ्या अंगांत शक्तिही आहे; कांहीं चिंता नाहीं. उद्यां दरबारांत जाऊन सर्व सेनेचा योग्य बंदोबस्त केला पाहिजे रणामध्यें पतन पावलों तरी बरें आणि शत्रूचा पराजय केल्यास फारच उत्तम [ नेत्रांत अश्रू आणून ] प्रियसखे,एक दोन दिवसांत तुझी भेट घेण्यास मीही येतोंच. ( नेत्र पुशीत निद्रामहालांत गमन करतो. )

**प्रवेश ५ वा समाप्त.**

---



# अंक ५ वा.

---

## प्रवेश १ 'ला.

---

स्थळ—रणभूमि.

पात्रें.

विक्रम .........अवंतीचा राजा.
सूर्यकांत .......त्याचा प्रधान.
सिंहध्वज.. ....सेनापती.
कामसेन .......देवनगरीचा राजा.
चंद्रचूड.........त्याचा प्रधान.
वीरबाहू....... सेनापती.
माधव.......... द्विजपुत्र.
कामकंदला. ...नायिका.
गिरजा..........तिची दासी.
वसंती..........रतिप्रियेची दासी.
सूत्रधार........नाटकाचार्य.
विदूषक... ...त्याचा मित्र.
शृंगारवल्लरी }
चंपकमालती } ....माधवाच्या स्त्रिया.

उपेंद्रवज्रा.

वेश्येकरीतां बहु नाश होतो ॥
लौकीक सारा जनिं व्यर्थ जातो ॥
दृष्टांत हा तूमच्या लक्षिं राहो ॥
घेऊन कित्ता विजया करा हो ॥१॥

[ तदनंतर कामसेन सर्व सैन्यासह रंगभूमीमत प्रवेश करितो. ]

कामसेन–( त्वेषानें ) प्रधानजी, आतां हातांत घेतलेल्या कामाचा चांगल्या रीतिनें शेवट केला, तरच मजा. नाहींतर चंद्राप्रमाणें अपकीर्तिरूपी कलंक लागला म्हणजे फार कठीण. ह्याचा मात्र नीट विचार करा.

चंद्रचूड–[ हात जोडून ] सरकार, कृपाकरून आपण सेनापतीस सैन्याची संख्या विचारून सर्व गलबला शांत होण्यास आज्ञा केली असतां परिधान केलेलीं वस्त्रें त्वेषानें फाटून जातील, असा कांहीं आपल्या सन्मुखच सेनेस उपदेश करितो.

कामसेन–सेनापते, ह्यावेळेस येथें किती सेना प्राप्त झाली आहे ? वेळेशिवाय परिक्षा होत नाहीं.

वीरबाहू–( हस्त जोडून ) नृपशार्दूला, ह्यावेळेस समरंगणांत प्रत्यक्ष काळाचा काळ येऊन युद्ध करण्यास उभा राहिला असतां त्यासही आडमार्गानें पळवून लावतील असे दीडशें सरदार असून प्रत्येकाजवळ मागें सांगितल्याप्रमाणें रथी, महारथी, अतिरथी, हत्ती, घोडेस्वार, पायदळ, वगैरे मिळून अगणीत सैन्य प्राप्त झालें आहे. शत्रूचा प्रात होण्याचाच काय तो उशीर. मी, आपल्या मुखेंकरून आपलीच प्रतिष्ठा सरकाराजवळ वर्णन करावी असें नाहीं. तो देखावा दृष्टीस पडण्याचाही समय प्राप्त झाला आहे.

कामसेन–फार उत्तम आहे. सचिवा, जें कांहीं आपणांस ह्मणणें आहे तें आतां सावधानचित्तेंकरून म्हणावें.

चंद्रचूड–बरें आहे. प्रधान, अष्टप्रधानादिक जनहो, ऐका; सरदार, रथी, महारथी, अतीरथी आदि मित्रहो, श्रवण करा: ज्या प्राण्यानें आपणा सर्वांस आजपर्यंत अन्नवस्त्र देऊन प्रतिष्ठेने प्रतिपालन केलें त्यास अशा प्रसंगीं होईल तसें साह्य करावें हा आपला सेवकधर्म आहे. मी आपणांस सांगावें असें नाहीं. परंतु इतकें मात्र लक्षांत ठेवा कीं, शत्रूची सेना प्राप्त झाली ह्मणजे प्रत्येकानें आपआपल्या मनांत असें समजावें कीं, मला आसनीं, शयनीं, उठतां, बसतां, खातां, पितां, बोलतां, चालतां, शत्रूचीच सेना दिसते. तर इचा आतां वध करावा. योद्धेहो, अहो, हीं गोपुरें, कौलें, भिंती, माती, धान्य, पाणी, वगैरे, सर्व वस्तुव्यापित ही शत्रुची सेना आहे, असें समजून किर्तीरुपी स्त्रीशीं आपलें प्रत्येकानें लग्न करून पराजयास सर्वांनीं आपले घरीं सर्व कष्ट करण्यास लावावें. जसें, वृद्धपणीं, पुत्रस्नुषेची परस्परांवर प्रीति व क्रीडा पाहून त्यांच्या मातापित्यांस सुख होतें तद्वत् तुम्ही विजयध्वज उभारिला असतां आपले **कामसेन** सरकारास अतीशय आनंद वाटून सांप्रत प्राप्त झालेल्या दुःखरूपीं पर्वतावर कीर्तिरूपीं खड्ग पडलें असतां सहज त्याचा चुराडा होईल. योद्धेहो, युद्ध करतेसमयीं रोषास आपलेंसें करा, कारण अर्धी शक्ती तर त्याच्याच असते. नेम धरून तीर मारा. पवित्रे ऐटदार ठेवा. घोड्यावर स्वार होऊन वाटेल तशी शत्रुसेना कापा. मग तेथें कोणीही असो.

विदूषक–तो पहा माझ्या हुकुमानें विक्रम आपल्या सेने-सह तुमचे बारा वाजविण्याकरितां येत आहे. तर बरें बोलानें मुकाट्यानें येथून उठून आपला रस्ता धरा ह्मणजे झालें.

कामसेन–[ त्वेषानें ] सेनापते, सावध व्हा. सेनेस उभें करणें असेल तसें करावें.

चंद्रचूड व वीरबाहू–सरकार, आपण कांहीं काळजी करूं नये. आम्ही सर्व त्याची व्यवस्था करतों.

( विक्रमादि प्रवेश करितात. )

विदूषकः–

पद.

( लंडे गुंडे या चालीवर )

विक्रम राजा कामसेनही, उभय दळपती पातले ॥
कलह भारी होतां होतां, युद्धातेंही प्रवर्तले ॥ धृ० २
भंभंभंभं शंख वाजुनी, वीरें केली गर्जना ॥
कडकडकडकड रणवाद्येंहीं वाजति कर्णा सणाणा ॥ १
चमचमचमचम शस्त्र चकमती, अश्वहि छुमछुम नाचति
दारूगोळा बंदुक आदि, धडधड तोफा सूटती ॥ २ ॥
एक रथावरिं एक हयावरिं, सिंहारीवरिं अंबारीं ॥
उभय नृपती बसती भारि, विक्रम कामसेनारी ॥ ३ ॥
हयेहयातें वीराविरातें, मारिति शस्त्रें सणाणा [1] ॥
कुंजर करिती अती गर्जना, बाण सूटती खणाणा ॥ ४

याप्रमाणें दोन्हीं सैन्यें निकरानें लढत असतां जमीन

---

१ घोडेस्वार.

अस्मान एकच झालें कीं काय? असें त्यावेळेस उठलेल्या धुळीवरून वाटे., दोन्हीही फौजेंचा, विशेषेंकरून **कामसेनाच्या** सेनेचा विशेष नाश झालेला पाहून **कामसेना**कडचा सेनापति **वीरबाहू** त्याची आज्ञा घेऊन **विक्रमाचा** सेनापाति **सिंहध्वज** ह्याशीं बराच वेळ झुंपला. नंतर **सिंहध्वजानें** आपले नांवाप्रमाणें कीर्ति करून **वीरबाहूस** यमाजीभास्कराच्या दरबारीं पाठीवलें तों उभय प्रधान युद्धास उभे रहात आहेत.

**सूर्यकांत**–**चंद्रचूडा,** ह्या सूर्यापुढें चंद्राचें तें तेज कितीसें पडणार? यांतच समजून मुकाट्यानें आह्मांस राजासह शरण येऊन **'कामकंदला'** वेश्या आह्माकडेस पाठविली असतां तुह्मां सर्वांस काडी इतकें सुद्धां भय नाहीं.

**चंद्रचूड**–[ अतीशय संतापानें ] अरे हो, आहे माहीत. रणांत युद्ध करणे सोडून भलत्याच गोष्टी बकत बसला आहेस. लज्जा वाटत नाहीं? वास्तवीक तुह्मां सर्वांना **'कामकंदला'** जीवंत आहेसें वाटतें खरें, परंतु तीन दिवस झाले तिला विषाचा पेला पाजून मारून टाकली आहे.

**सूर्यकांत**–अरे निर्दया, चल आतां घे सरशेवटचें प्रायःश्चित एकदाचें; ( असें म्हणून त्याचा शिरच्छेद करतो व तें शिर **कामसेनाच्या** चरणावर जाऊन आदळतें. तें घेऊन **कामसेन** शोकसागरीं वास करीत आहे तों **विक्रम, वेताळानें** दिलेलें खड्ग हस्तामध्यें

धारण करून **कामसेनास** लत्ताप्रहार करतो आणि म्हणूं लागतो. )

**विक्रम**—निर्लज्जा, जासुदाकरवीं त्वां माझी विटंबना करून युद्धास सिद्ध हो हें त्वां उत्तर द्यावें ना ? अरे, इतके दिवस माझ्याशीं स्नेह ठेवून आतां-च तुला अक्काबाईचा फेरा आला कीं काय ? तूं आ-पल्यामुखें आपणांस शूर म्हणवितोस, तर रणाचेठायीं प्राप्त होऊन युद्धप्रसंगीं प्रधानाचें शीर घेऊन पति-साठीं अबला तद्वत तूं शोकसागरीं वास कां केलास. (त्यास ढकलून) चल ऊठ.

**कामसेन**—[ इकडे तिकडे पाहून ) अरे, ह्यावेळेस मला कोणी दुष्टानें लत्ताप्रहार केला. [ त्वेषानें हस्ताचे ठायीं खड्ग धारण करून **विक्रमास** म्हणतो ] निर्बला, चल, पहा आतां माझी युद्धकुशलता.

**विक्रम**—फार उत्तम आहे. माझ्याही मनांत पण तेंच होतें [ दोघांचेंही मोठें घोरांदर युद्ध होतें ] शाबास **कामसेना** शाबास. [ मनांत ] हे **वेताळा,** त्वां दिले-ल्या खड्गाचा आतां ह्यावर प्रयोग करतों, कृपाकरून ह्या खड्गाच्या योगानें ह्याचा शिरच्छेद झालाच पाहिजे. [ खड्गप्रयोग करूं लागतो. )

**कामसेन**—सिंहापुढें जरी जंबुकानें हवेंतसें केलें तरी त्याचा रोमही हलणें नाहीं.. त्याचप्रमाणें जरी तूं खड्गप्रयोग आरंभिलास तरी तो निर्फल जाणार आहे. ( **कामसे-नाचा** शिरच्छेद होतो ).

( विक्रमाचे सेनेंत जयघोष होतो. )

**माधव**–( हर्षानें **विक्रमा**च्या गळ्यांत मीठी मारून ) **विक्रमा**, खरोखर तुझे मजवर अगणित उपकार झाले आहेत. त्यांचा मी वास्तवीक ऋणी आहे. कृपाकरून आतां **कामकंदले**ची आणि माझी भेट लवकर करीव.

**विक्रम**–जरा धीर तर धरा. ईश्वरकृपेनें मला जय प्राप्त झाला आहे तर सर्व कांहीं तुमचें मनोवांछित कार्य सिद्धीस जाईल.

**चंपकमालती**–[ **माधवा**च्या चरणांवर गडबडा लोळण घेऊन मोठयानें आक्रोश करते ) प्राणनाथ, कृपाकरून मला बापाचें प्रेत तरी दाखवा. मी तुमच्या पायां पडतें. ( उसासा टाकून ), शिव शिव !! परमेश्वरा, कसेंरे माझ्या आईचं सौभाग्य नेलेंस ? नारायणा, धांव आतां [ मूर्छित होते ].

**विक्रम**–**माधवा**, ही येथील कोणातरी योद्धयाची कन्या असावीसें अनुमान आहे.

**माधव**–( आसवें येतात ) राजा, **चंद्रचूड** प्रधानाचीच ही कन्या ! ( **चंपकमालतीस** ) प्रिये, उठ शोक करून उपयोग काय ? झालें तें झालें 'गतन्न शोच्यं.

**चंपकमालती**–सख्या, मला दुसरें कांहीं नको, एकवेळ मला तें प्रेत दाखवा म्हणजे झालें.

**विक्रम**–[ आकाशाकडे पाहून ] ह्यावेळेस पाऊस येण्याची संधी आहे. पहा पहा, ढगें कशीं जमत चाललीं आहेत. सूर्यकिरणांचा तर लोपच झाला आहे. बाराही सुटण्याची वेळ आहे. मी कांहीं खोटें बोलणार

नाहीं. खरेंच ह्यावेळेस कसा प्रचंड वायू सुटला आहे. ओहो, वृक्षही किती पतन पावले आहेत. वाहवारे व! माधवा, पाहिलेंतना? पाऊस व रणामध्यें पतन पावलेल्या मनुष्यांचे अशुद्ध एकच होऊन तांबड्या लाल पाण्याचे लोट वहात जात आहेत. काय हा पाऊस तरी! बहुतकरून ह्या रक्तवर्ण नदींतें सर्व प्रेतें वाहून गेलीं असावीं! अरे हो, तीं पहा जातच आहेत. किती तरी हा भयंकर देखावा! आणि अशांत तुमची स्त्री आपल्या पित्याचें प्रेत पाहण्यास जाणार होती! सध्यां एथें शिबिरांत आहोंत म्हणून बरें आहे. बिचाऱ्या कामसेनाकडचा जिवंत मनुष्य येथें एकही दिसत नाहीं. जरी इतकें घोर रण झालें तरी ह्या वेळेस कशी सामसूम झाली आहे. आतां थोडासा पाऊस उघडला आहे. माधवा, इकडे या पहूं, तें पहा घोंगडीमध्यें बांधलेलें प्रेत त्या झाडाला कसें लागून राहिलें आहे. तो पहा ह्याचा एकच पाय त्या घोंगडीबाहेर आला असून पायाच्या बोटांत जोडवीं दिसतात. कोणी तरी, निःसंशय स्त्री असावी. चला तर आपण पाहूं बरें काय आहे तें!

**माधव**–(हंसून) अरे हो खरेंच, ती स्त्री असावी. (असें म्हणून उभयतांही तेथें कांहीं माणसें बरोबर घेऊन जातात.)

**विक्रम**–(तिला मुक्त करून) अरेरे, काय हिची ही दुरावस्था! हिच्या तोंडाकडे पाहिलें ह्मणजे कामकंदलेची दासी गिरजेचा भास होतो.

**माधव**–( हर्षानें तिच्या नेत्रांस पाणी लावितो ) हे **वसंते,** सावध हो, डोळे उघड. तुझी यजमानीन **चंपक-मालती** तुझा शोध करण्याकरितां येथें प्राप्त झाली आहे ( तों **चंपकमालती** तेथें येऊन गहिंवरते ).

**वसंती**–( अडखळत बोलते,) का कोण अ आहे, म मीं थं थंडीनें क काकडून ग गेल्यें आहें कु–कुठं–त–तरी ऊ–उबेमध्यें नि–निजवा, म्ह– म्हणजे म–मला थ–थोडिशी श– शक्तितरी –येईल.

**चंपकमालती**– (मनांत) ईश्वरा, सर्व तूं यथासांग केलंस, परंतु बाबाचं प्रेत तरी दृष्टीस पडूं दे. जरी त्यानं मला फार गांजलं तरी पण त्याला एकदां पाहिल्या-वांचून रहावतच नाहीं. असो. ( **वसंतीस** दुसऱ्याक-डून नेऊन नीट व्यवस्थेनें ठेवून **विक्रम, माध-व** व आपण असे त्रिवर्ग **चंद्रचूडाचें** प्रेत पहाण्यास जातात. )

**विक्रम**–काय करावें, इतके चहूंकडे शोधलें, परंतु अद्या-प मिळत नाहीं. मला वाटतें तें बहुतकरून सर्व प्रेतांबरोबर वाहून गेलें असावें.

**चंपकमालती**–( जमिनीवर आंग टाकून ) वाहून कसं जाईल ? हे पहा माझे बाबा कसे सावकाशपणें महा-निद्रा घेत पडले आहेत:—बाबा, सावध व्हा, मारेकऱ्यांच्या हातून निसटलेली तुमची प्रियकन्या **चंपकमालती** प्रत्यक्ष उठवीत असतां किमर्थ मौन्य धारण केलंत बाबा, तुमच्यावांचून आतां माझी 'शशिकला' आई काय करील ? सर्वस्वी कसं तिला

उघडं पाडलंत. आईग, आतां तूं काय करशील.
शिव शिव ! ! देवा—[ रडूं लागते ]

**माधव**–[तिला] असं काय ? असं काय ? उठ. पुढची सोय लावली पाहिजे. तूं तर मोठी शहाणी आहेस. चल ऊठ. [ त्रिवर्ग परत जातात तों वाटेंत पेटी पाहून **माधव विक्रमास** म्हणतो ] भूपते, हें पहा, तिसरें एक लचांड काय आलें तें ! उघडून तर पहा बरें, यांत काय निघतें तें !

**विक्रम**–असें करून कांहीं उपयोग नाहीं. ह्या पेटीस प्रथमतः डेऱ्यांत नेऊन घटकाभर तेथेंच असूं द्यावी. सर्व कार्य झाल्यानंतर मग पहातां येईल. सर्व दमले आहेत ह्मणून सर्वत्रांस थोडी विश्रांति मिळाली पाहिजे. ( सेवक पेटी नेऊन ठेवतात. )

**माधव**–[रात्रीच्या समयीं त्या पेटीवर सहज **विक्रमा**शीं बोलत बसतां तों एकदम दचकून **माधव** दूर होतो तों **विक्रम** त्यास म्हणतो ]

**विक्रम**–कां ? झालें काय इतकें भ्यायला?

**माधव**–नाहीं बा, त्यामधें कोणी तरी आहे. त्याच्यांतून जेव्हां 'अग आई' असा हळूच आवाज निघाला तेव्ह मला वाटलें कीं, यांत कांहीं तरी असावें. लौकर फोडून तर पहा बरें काय निघतें तें ? [ तदनंतर **विक्रम** ती पेटी शिपायांकरवीं अस्ताईनें फोडवितो तों आंतला प्राणी **माधवाच्या** दृष्टीस पडतांच तो मोठ्यानें किंकाळी फोडून म्हणतो ]; प्रिये, **कामकंदले**, येथें तुला कोणत्या निर्दयानें कोंडलें ?

शिव शिव !! देवा, तुझी लीला अगाध आहे. [ तीस शिपाई लोक बाहेर काढून पराच्या मऊ गादीवर ठेवितात. माधवाची व तिची दृष्टादृष्ट होतांच दोघांसही विलक्षण गहिंवर आला. इतक्यांत त्याच्या दोघी स्त्रिया शृंगारवल्लरी व चंपकमालती अशा उभयतां तेथें येऊन कामकंदलेस अंतर्गृहांत नेऊन तिची उत्तम प्रकारची व्यवस्था करित्या झाल्या. जरी त्यावेळेस सर्वांचीं अंतःकरणें प्रफुल्लित होतीं तरी शृंगारवल्लरी आपल्या बालकाच्या वियोगानें रात्रंदिवस खिन्न असे. ]

**विक्रम**–वा माधवा, हातांत घेतलेलें कार्य तर ईश्वरकृपेंकरून तडीस गेलें. उद्यां तुला कामसेनाच्या गादीवर बसवून तें सर्व राज्य तुला समर्पण केलें ह्मणजे कृतकृत्य झालों. हवीतशी आतां त्रिकांडाबरोबर क्रीडा करा, परंतु आह्मांस मात्र कामसेनाप्रमाणें विसरूं नका.

**माधव**–[ हंसून ] बरोबर, तुम्ही जर थट्टा न कराल तर कोण तुमचीं पोरें करतील ?

**विक्रम**–बरें, तें राहूंद्या; परंतु आतां गिरजेचा ठिकाण काय ? कामसेनानें सरतेशेवटीं कामकंदला व गिरजा ह्या उभयतांसही थोडासा तडाखा दाखवून स्वर्गीं गमन केलें ! तिचा तेवढा शोध लागला कीं सुटलों मी मग.

**माधव**–विक्रमराज, मला बरें कुठून कळणार ?

काउ रात्रींच मी चार हेर तिच्या शोधार्थ पाठविले आहेत.

विक्रम–उद्यां प्रातःकाळीं नगरप्रवेश करणें आहे, म्हणून सर्व तयारी केली पाहिजे.

( सर्व निघून जातात. )

( पडदा पडतो. )

प्रवेश १ ला समाप्त.

---



## प्रवेश २ रा.

स्थळ–गोमाजीकापसे ह्यांचा दिवाणखाना.

पात्रें.

गोमाजीकापसे........एक गृहस्थ.
लिंगंभट ..............यांचे मित्र.
अप्पलपोटे............राजाचे उपाध्याय.
उडाणटप्पू............ अप्पलपोट्यांचे मित्र.

[ तदनंतर **गोमाजीकापसे** प्रवेश करतात]

**गोमाजीकापसे**–( मनाशींच ) काय करावें ? बिचारा **कामसेन** राजा कसा सज्जन असून पोक्तविचारी असे. प्रजेस ह्मणून तो बिलकुल त्रास देत नसे, त्याच्या कारकीर्दींत सर्वच सुखी असून लोक त्याचे जिवावर अंचटशौकिपणा करीत होते. सांप्रतचा युवराजा कसा आहे, ह्याचें अनुमान, त्यास राज्याभिषेक झाला तेव्हांच केलें. त्याच्या मुखचर्येकडे अवलोकन केलें असतां विलासी व चिकित्सखोर दिसतो खरा, परंतु तो रयतेस पोटच्या लेंकराप्रमाणें पाळील असें मला तर वाटत नाहीं. असो, 'कुंभाराची सून कधींना कधींतरी उकिरड्यावर येइलच'. **कामसेन** महाराजाकरितां तर मला फार वाईट वाटतें. असो, होईल तें होवो. आपणांस काय कर्तव्य आहे ? आपण आपलें खबरदारीनें वागलें ह्मणजे झालें. ( इतक्यांत त्याचे मित्र येतात. )

**लिंगंभट**–[ लवून ] नमस्कारहो **गोमाजीकापसे**.

**गोमाजीकापसे**—नमस्कार, नमस्कार; या बसा. कोणीकडे आज वाट चुकलेत ?

**लिंगंभट**—नाहीं. फार दिवस आपलेकडे या लढाईच्या गडबडीने आलों नव्हतों ह्मणून आज सहज येथें आलों.

**गोमाजीकापसे**—बरें कांहीं नवल विशेष?

**लिंगंभट**—नवल विशेष काय ? आपल्या **कामसेन** सरकारच्या गादीवर दुसरा राजा झाला, येवढेंच. दुसरें कांहीं नाहीं. बरें तें असो पण कांहो, आज **अप्पलपोटे** बुआ नाहीं आले ? [ इतक्यांत तेही येतात. ]

**गोमाजीकापसे**—[ त्यांच्याकडे बोट करून ] ते पहा, नांव घेतांच आले. याहो **आप्पलपोटे**, बसा असे.

**अप्पलपोटे**—( दोघांस ) नमस्कार.

**गोमाजीकापसे** व **लिंगंभट**—नमस्कार. आजकाल तुमची तर खालून वरून चंगळ असेल.

**अप्पलपोटे**—अरे, अशा गर्दींत आम्हांस हो कोण विचारतो. सर्वांपेक्षां आमचे मित्र **'उडाणटप्पू'** त्याची बरीक खूप चंगळ उडाली.

**लिंगंभट**—मग ते कोठें आहेत?

**अप्पलपोटे**—तेही येतातच, वाट चालत असतील. (याप्रमाणें संभाषण चालत आहे तों **उडाणटप्पू** येतात. नमस्कार झाल्यावर **गोमाजीकापसे** संभाषण करण्यास आरंभ करितात. )

**गोमाजीकापसे**—कांहो **उडाणटप्पू**, सांपतचे सरकार कसे आहेत?

उडाणटप्पू–सरकारचे कुळगुरु अप्पलपोट्यांस विचारा; ह्मणजे समजेल.

अप्पलपोटे–नाहीं बुआ. राजा तर फार चांगला आहे. जितकी आपण दक्षणा देवापुढें किंवा पुजेबद्दल अथवा दुसऱ्या कशाबद्दल, इतकी ठेवली पाहिजे तर तो आंकडा कांहीं खालीं जात नाहीं. आतां उद्यां ब्राम्हण भोजन आहेना. एक एक जुलाब ध्या ह्मणजे लाडू तरी पुष्कळ जातील. शिवाय प्रत्येक ब्राम्हणास, लहानापासून थोरापर्यंत 'एक मोहोर व एक शालजोडी' ही दक्षणा आहे. व तें काम माधवसरकारांनीं माझे अंगावरच टाकलें आहे.

लिंगंभट–काय म्हणतां? मग मारा हात. घुमा घुमाके.

गोमाजीकापसे–पण कांहो, अप्पलपोटे गुरु; विक्रम गेलेला तर मला माहीत आहे, परंतु गिरजा, आपल्या कामकंदला बाईसाहेबांची दासी, इचा, व सरकारांच्या पट्टराणीच्या मुलाचा ठिकाण नव्हता तर त्यांची कशी अकस्मात् आपल्या दैववान् नव्या राजास प्राप्ति झाली हें काल मला एका कारकुनानें सांगितलें. पण हेंही मोठें नवलच म्हणायचें कीं, कामकंदला माधवास रणामध्यें पेटींत घातलेली सांपडली. याची सर्व हकीगत . आपल्यास ठाऊक असेलच, कारण आपण अप्पलपोटे कुळगुरु!

अप्पलपोटे–मीं तर काल पूजाविधी, गृहप्रवेश, वगैरे ह्यांच्या गडबडींत होतों ह्मणून मला कांहीं चांगलेंसें समजलें नाहीं. हें सर्व उडाणटप्पूस माहित आहे.

लिंगभट–कांहो उडाणटप्पू? कोठें कोठें आपलें काल उड्डाण गेलें होतें?

उडाणटप्पू–ऐका बरें. **विक्रमाकडून** आपल्या माजी सरकारास **'कामकंदला'** देऊन आणखीं राहिलेली खंडणी त्वरीत पाठवून दे ह्मणून जासुदाकरवीं पत्र आलें हें सर्वांस विदितच आहे. त्याच दिवशीं रात्रीं **कामसेन** महाराजांनीं **'रामसींग'** बंदीरक्षक ह्मास बोलावून तिला विचारीला पेटीमध्यें कोंडून ती पेटी रणभूमीजवळच पुरण्यास सांगून तिची दासी **गिरजा** इचे हस्तपाद बांधून मिरच्यांची धुरी रोज देण्यास सांगितली. परंतु **रामसींग** मोठा कनवाळू आहे हें आपणांस माहितच आहे. त्यानें होय ह्मणून तिला (दासीस) एका अंधार कोठडींत कोंडून **कामकंदलेची** पेटी डोक्यावर घेतली आणि युद्धाच्या गडबडींत जवळच खाच खणून त्यांत ती पेटी मोठ्या कष्टानें टाकली. त्या वेळेस त्याला फारच वाईट वाटलें. कारण तिनें कैदेंत असतां **रामसिंगास** बरेंच द्रव्य दिलें होतें असें ऐकण्यांत आलें आहे. असो. खाचेंत पेटी टाकल्यावर **रामसिंग** आपल्या नौकरीवर जाऊं लागला तों **कामसेन** सरकारची मृत्युवार्ता त्यास श्रुत झाली. इकडे **कामसेन** सर्व सैन्यासह नाशास पात्र झाला, व तिकडे कामकंदलाही आपल्या जिवानिशीं व्यर्थ जाणार असें समजून मोठ्या हिय्यानें तो खाचेंतून पेटी काढूं लागला तों मेघराजांनींही त्या दिवशीं एकच धाम धूम केली. लाखों प्रेतें रक्तवर्ण नदींत वाहून गेलीं. अशा

समयीं **चंपकमालती** बाईसाहेब आपल्या पित्याच्या शोधार्थ निघाल्या तों **रामसिंगास** तिनें पेटी काढतांना पाहिलें तों **रामसिंग** भयकंपित होऊन आपला जीव घेऊन पळाला. नंतर ती पेटी **माधवानें** पाहिल्यावर त्या बिचारीची तेथून सुटका केली. परवाच्या दिवशीं **माधवसरकार** दरबारांत बसलेले **रामसिंगानें** पहातांच, **गिरजेची** सुटका करून तेथें आणली. **कामकंदलेनें,** हा फार सद्गुणी मनुष्य असून त्याने मला वाचविलें ह्मणून, शिफारसीचा मजकूर निवेदन केलाच होता. तें स्मरून व **गिरजेचीही** सुटका ह्यांनेच केली असें समजून त्यास त्यांनीं मोठें बक्षीस देऊन एकदम त्यास आपला सेनापति केला.

**गोमाजीकापसे**–ह्याचें नांव सेवकधर्म. परंतु **कामसेनांनीं चंपकमालती** व **वसंती** ह्या दोघींसही मोरेकऱ्यांच्या हस्तें मारण्यास पाठविल्या असतां **चंपकमालती** आपल्या सरकारची स्त्री कशी झाली? व **वसंतीही** सुखरूप कसी ह्यांनां मिळाली? हेंही अपणांस विदित असेलच.

**उडाणटप्पू**– [ हंसून ] तें सर्व मला विचारा. मोरेकरी लोकांच्या हातांत त्या बिचाऱ्या दोघी पडतांच एका ओसाड जागेंत नेऊन त्यांनीं दोघींचा वध करण्यार्थ शस्त्र उगारलें. मित्रहो, त्या वेळेस त्या दोघींस काय वाटलें असेल ह्याची आपणच कल्पना करा. त्या दोघींनी त्या निर्दयांची इतकी विनयपूर्वक विनंती केली कीं, ती ऐकून त्यांना तर काय? परंतु जवळ अस-

लल्या पशुपक्ष्यांसही रुदन आलें. ज्यांनीं शस्त्रें उचललीं होतीं ते तर धाय धाय रडूं लागले! हातापायांतली शक्ती क्षीण होऊन धारण केलेलीं शस्त्रें गळून भूमिप्रत पतन पावलीं. अशा समयीं त्यांच्यांतून एकानें म्हटलें कीं, जा भगिनींनो, तुम्हांस काडी इतकें सुद्धां भय नाहीं. आम्ही तुह्मां दोघींनांही जीवदान दिलें. त्या वेळीं त्यांचा आभार मानून दोघींनींही 'ईश्वर तुमचें कल्याण करो' असा आशिर्वाद दिला. परंतु जर ही गोष्ट राजास समजली तर परिणाम कठीण, ह्मणून त्यांनीं मनांत धैर्य धरून दोघींचे डोळे बांधले व दोघींना दोन दिशांकडे लाविलें, त्यांची ह्याप्रमाणें व्यवस्था लाविल्यावर त्यांनीं कृत्रिम शीरें तयार करून राजास दिलीं. राजा शुद्धीवर त्यावेळीं नसल्याकारणानें त्यानें तशाच शिरांसह रतीप्रिया राणीसाहेबांचें प्रेत दहन केलें. मित्रहो, आतां ह्या **चंपकमालतीचा माधवाशीं** विवाह कसा झाला पहा. इला त्यांनीं त्या दिवशीं अंधार रात्रीं भयंकर अरण्यांत दूर सोडून दिल्यावर, ती विचारी करुणा स्वरानें रडूं लागली. डोळे अतीशय घट्ट बांधल्याकारणानें विचारीस आधीं दिसेना, आणि तशांत चहूंकडे डोळ्यांत बोट घातलें तरी दिसणार नाहीं अशी काळोखी; अशासमयास ती वेल्हाळी त्या रानांत इकडून तिकडे तिकडून इकडे दीनवाणी हिंडूं लागली. डोळे बांधल्या कारणानें तीस नीट दिसेना ह्मणून सहज खांचेंत पाय पडला कीं विचारीचें सर्वांग दुखे. अंगाचीं कातडीं ओरबडून रक्त निघे. अनेक प्रकारचीं

त्या स्थानीं झाडें असल्या कारणानें पायांस ठेंचा लागत, कांटे मोडत, काय त्या वेळेस तिचें दुःख वर्णन करावें!! 'आगींतून निघाली आणि फुपाट्यांत पडली'. असो. दोन तीन दिवस उपाशीं, तापाशीं तशीच ठेंचा खात मनास वाटेल, व जिकडे पाऊल पडे तिकडे जाई! तिसरे दिवशीं तिने मोठा हिय्या करून 'मी फडकं सोडीन तेव्हांच राहीन' असा पण केल्यावर तिनें बरेंच बळ खर्च करून तें कापड सोडलें एकदाचें!! आणि उदास मुद्रेनें चहूंकडे पाहूं लागली तों आपण एका बागेंत एका आम्रवृक्षाखालीं बसलों आहों, असें तीस वाटलें. जाई, जुई, गुलाब, गुलछबू, शेवंती, पन्नार आदि पुष्पांचा घमघमाट सुवास सुटला आहे! बागेमधें पुष्कळ प्रकारच्या नक्षीचे अनेक हौद असून प्रत्येकास हजारो तोट्या लाविल्यामुळें त्यांतून लक्षावधी तुषार जवळ ठेविलेल्या पुष्पांवर पडल्यामुळें जशीं काय हीं ताजींच आहेत असें भासे. अशा रमणीय स्थलांत आपण सहज प्राप्त झालों असें पाहून तीस आनंद झाला. दोन तीन दिवस खाण्यास न मिळाल्यामुळें तशीच कुंथत जाऊन एका हौदांत तोंड आणि हातपाय धुतले व जवळ असलेल्या फळझाडांचीं कांहीं फळें भक्षण केलीं तीं तेसमयीं अमृतच काय? असें तिला वाटे. क्षुधा शमन झाल्यावर शरीरास मंद मंद वायू लागल्यानंतर तिच्या मनास जरा हुशारी वाटून तिनें तेथेंच शरीर टाकिलें तों अकस्मात तिच्या कानीं खालील अकल्पित व

टोळींतला एकजण ह्मणाला, कामसेनाचा युद्धांत पराजय झाला ह्मणून आह्मी आपला जीव घेऊन आडमार्गानें पळतच जात आहों; परंतु पोटाला तर जाळायला पाहिजे कां नाहीं आधीं? असें ह्मणून त्या चोरट्यांनी गमन केलें. एक दोन दिवसपर्यंत तिनें पाण्यावरच तरंगून काढिले, परंतु मोठा पाऊस पडल्यामुळें नदीला पाणी येऊन बिचारी वहात गेली तों रणभूमीच्या किनाऱ्यावर झाड आहे त्यास अडकून राहिली. विक्रमाच्या हें दृष्टीस पडतांच त्यानें तिची सुटका केली. नंतरची हकीगत तुम्हां सर्वांस माहितच आहे.

लिंगंभट–( त्याची पाठ थापटून ) अरे शाबासरे, उडाणटप्पु! एवढी तुलारे कशी साद्यंत हकीकत समजली? ज्याप्रमाणें इतकें तूं भागवताचें पारायण केलें त्याप्रमाणें 'शृंगारवल्लरी' बाईसाहेबांस त्यांच्या प्रिय बालकाचीरे भेट कशी झाली!

उडाणटप्पु–जेव्हां शृंगारवल्लरी बाईसाहेब सावकारलोकांपासून अतिशय त्रास पावून आपल्या तान्ह्या बालकासह एका अरण्यांत आल्या तेव्हां त्यांना आतां जावं तरी कुणीकडे? म्हणून पंचाइत पडली. पुढें जावं तरी वाईट, कारण त्या दिवशीं रात्रीचा समय असल्याकारणानें तिला कोठेंच जाण्यास धैर्य होईना. मोठ्या मारामारीनें ती त्या स्थलीं आल्या बालकासह एका वृक्षाखालीं बसली. रात्र अंधारी असून किर्रर्र बोलत होतीं. त्यावेळेस शृंगारवल्लरीनें आपलें मस्तक दोन्ही गुडघ्यांमध्यें घालून प्रातःकाळीं कोणीकडे जावें ह्या विचा-

रांत निमग्न होती, इतक्यांत त्या बालकाची तिला स्मृती होऊन त्याला पाहूं लागली तों तें नाहींसें झालेलें पाहून फारच आक्रोश करूं लागली. त्यावेळेस तिची समजूत करण्यासही कोणी जवळ नव्हतें आणि खरोखरच ज्या स्त्रीचें आपल्या लेंकरावर खरें प्रेम असतें तीसच त्या दुःखाची कल्पना करितां येईल. इतरांस म्हणजे तुमच्या आमच्यासारख्यांस त्याचें काय दुःख? असो, बालकाचा वियोग झालेला पाहून तिला शरीराचा त्रास आला, आतां अशा प्रसंगांतून पार पडून पतीची भेट होणें ह्याची तर आशाच नाहीं. जवळ पतीही नाहींत कीं त्यांच्या मुखकमलाकडे पाहून झालेल्या दुःखाचा परिहार करावा. मित्रहो, शरीराचा तिला वैताग येतांच आत्महत्या करण्याकरितां एका विहीरीच्या कांठावर ती दुःखीत होऊन उभी राहिली. आंत आतां उडी टाकावी तों त्या वनांमध्यें भ्रमण करणाऱ्या '**वज्रशील**' नावाच्या राक्षसानें मेघगर्जनेप्रमाणें मोठ्याने किंकाळी फोडली त्यामुळें तिचें भयानें देहभान जाऊन तशीच मूर्छित पडली. मित्रहो, आपणास आतां हा राक्षस कोण? व येथें कसा प्राप्त झाला हें सांगतों ऐका. "पूर्वी ज्या **तारकासुराचें** चहूंकडे वर्चस्व वाढलें तेवेळीं त्यानें हवें तसें देवांस गांजिलें हें तर बहुश्रुतच आहे. हजारो देवांगना धरून त्यानें बंदींत टाकिल्या. सुरासुरांचें पुष्कळ दिवस मधून मधून युद्ध होतच असे. अशा तडाक्यांत एक '**मंदांध**' नावाचा ऋषी तप करीत होता. त्यास एकच पुत्र होता. त्याचें

नांव पुष्पधन्वा होतें. पित्यानें पुष्पधन्व्याचें एका ऋषी कन्येशीं ह्याच्या अठरावे वर्षीं लग्न केलें. त्यावेळेस त्याच्या स्त्रीस नुकतेंच बारावें वर्ष लागलें होतें. **पुष्पधन्वा** आणि त्याची स्त्री **कमललोचना** अशीं दोघेंही तपस्वी **मदांध** ऋषींची मनोभावें सेवा करीत. **कमललोचना** ही स्वरूपानें फारच उत्तम आणि तशांत नुकेंच सोळावें वर्ष लागलें होतें, मग तिच्या तारुण्याचें व स्वरूपाचें किती ह्मणून वर्णन करावें! ह्याप्रमाणें कितीएक दिवसपर्यंत त्या स्त्रीपुरुषांनी त्या **मदांध** ऋषीच्या सेवेंत कालक्रमणा केली. पुढें, एके दिवशीं ईश्वरकृपेंकरून **कमललोचनेस** ऋतु प्राप्त झाला तेव्हां **मदांध** ऋषीनें त्या आनंदप्रदर्शनार्थ मोठा सोहळा केला. ऋतुसोहळा समाप्त झाल्यानंतर एके दिवशीं **मदांध** ऋषीची, म्हणजे तिच्या सासऱ्याची तिजवर सहजगत्या दृष्ट, ती पूजा करीत असतां गेली. सावकाशपणें **मदांधऋषीनें** तिचें सुस्वरूप अवलोकन करतांच कामव्याप्त झाला. दैवयोगानें त्यावेळेस तिचा पती म्हणजे **मदांधऋषीचा** पुत्र **पुष्पधन्वा** तोही घरीं नव्हता; तेव्हां ती स्वारी फार सुप्रसन्न होऊन **कमललोचनेस** ह्मणाली कीं, तुझ्या सेवेंकरून मी प्रसन्न झालों; काय मागणें असेल तें माग. मी देण्यास सिद्ध आहें. अनायासें आपल्यास मामंजी वर देतात तर घेण्यास तरी अनमान कां करावा? असें त्या निष्कपटी **कमललोचनेस** वाटून मोठ्या मर्यादेनें हस्त जोडून विनयपूर्वक ह्मणाली कीं, "म्यां पतिसवें

सुखांत सदाचारानें कालक्रमणा करावी व लवकरच पुत्रफल प्राप्ती व्हावी' येवढीच माझी इच्छा आहे. तें ऐकून 'तथास्तु' असें मदांध हंसत बोलला. एकेदिवशीं पुष्पधन्वा समीधा आणण्यास गेला आहे व ही आतां घरीं एकटीच अबला आहे, करितां आपली इच्छा पूर्ण करून घेण्यास हीच संधी चांगली होय असें त्यानें मनांत आणलें. मित्रहो, पहा कामदेवाचा कसा प्रताप आहे तो! अहो, प्रत्यक्ष ज्या तपस्व्यांनां तपापासून भ्रष्ट करून प्रत्यक्ष स्नुषेपाठीस लाविलें त्याला का सांप्रतचीं माणसें अशा कृत्यासाठीं वेडीं करण्यास उशीर लागेल काय? असो, मदांधानें हंसत हंसत तिजजवळ जाऊन ह्मटलें कीं, तुला पुत्र फलप्राप्ती व्हावी नां! हा आपणास एखादें त्याच्याच करितां भक्षणार्थ फळ देत आहे असें समजून 'होय' ह्मणाली. तिनें होय म्हणून म्हणतांच "कामातुराणां न भयन्न लज्जा," मदांधानें एकदम तिचा हात आपल्या हस्तांत धरून त्या अबलेवर त्या समयीं बलत्कार करण्यास आरंभ करूं लागला, तों तिनें मोठ्यानें किंकाळी फोडून म्हटलें कीं, 'अहो धांवा हो धांवा, कोणी मला सोडवा,' कोणीही आपल्यास मुक्त करण्यास येत नाहीं. असें पाहून त्वेषानें त्याच्या हातास झिडका मारला आणि विद्युलतेप्रमाणें सरकन दूर होऊन म्हणाली कीं, चांडाळा, तुझ्या नांवानं क्यां ती तपश्चर्या रडेल? मूर्खा, तुला लाज वाटत नाहीं! कोणाचा हात धरतोस? जर करतां तुला माझ्या शरीराचा वास घेणें असेल तर

एकदाचा मर आणि माझ्या पोटीं ये म्हणजे मी तुला सुखानें दुध पाजीत जाईन. चल जा येथून. कर काळं एकदाचं. ढेंकूळ पाण्यांत पडून जसें विरघळावें तसें मदांधास झालें; तरी तो म्हणाला कीं, "नांवाचा जर मदांध असेन तर हरघडी हरप्रयत्नें तुझा अभिलाष करून तुझें पातिव्रत्य मातीस मिळवीन समजलीस." ह्याप्रमाणें तो तिच्यावर दांत ओंठ खात मठाबाहेर संतापून जाता झाला तों मागचे दारानें अकस्मात पुष्पधन्वा कांहीं समिधा घेऊन आला तेव्हां कमल-लोचनेनें त्याच्या गळ्यास मिठी मारून म्हटलें कीं, प्राणनाथ, त्या भ्रष्टाच्या हातून मला वांचवा हो वांचवा. पुष्पधन्व्यानें तिचें हें वाक्य श्रवण केलें तेव्हां त्यासही मोठें आश्चर्य वाटून तो तीस म्हणाला, प्रिये, काय झालें तें सांग म्हणजे त्याप्रमाणें मी तजवीज करतों. हें ऐकून कमललोचनेनें झालेलें सर्व त्यास कथन केलें. तें ऐकून तो संतप्त व आश्चर्ययुक्त झाला कीं, हें असें कसें होइल ? पुन्हा त्यानें मनांत विचार केला कीं, न जाणो कामदेवाची स्वारी तर आहे ! धिक्कार असो त्या मदनाला, पित्याला, सेवेला आणि तपश्चर्येला. आपण आतां कमललोचनेस जर सोडून बाहेर कुठें जावें तर न जाणो तो पापी केव्हां येईल आणि काय करील ? आपण आतां घरांतून बाहेरच जाऊंनये असा विचार करून त्यानें कमललोचनेची पुष्कळ प्रकारानें समजूत केली आणि उभयतांही भोजनाच्या तयारींत आहेत तों एक भयानक तारकासुरांतल्या सेनेमधील अक्काळ वि-

काळ भयंकर निशाचर येऊन म्हणूं लागला कीं, कार्ट्या पुष्पधन्व्या, चल, घराबाहेर निघ, नाहीं तर तुला कच्चाच भक्षण करीन. असे त्याचे कठोर शब्द ऐकतांच उभयतांचीही गाळण होऊन बोबडी वळली, हात पाय लटलट कांपूं लागले. परंतु किती झालें तरी पुष्पधन्वा पुरुषच होता, त्यानें हिंम्या धरून त्या निशाचरास शाप देऊन म्हटलें कीं, ईश्वर तुला असेंच ठेवो. मला माहित आहे कोण आहेस तें तूं. तूं माझा पिता मदांध होस हें मीं तर अंतर्ज्ञानें करूनच जाणलें. ही स्त्री कांहीं केल्यानें आतां तुला मिळणार नाहीं. आल्या वाटेनें जा. पुष्पधन्व्याचें हें भाषण श्रवण करून त्या निशाचररूपी मदांधास फार वाईट वाटलें. आपण आतां राक्षसीमायेंतून पार पडून कमललोचनेस भोगूं हें तर दूरच राहिलें. अस्तु. झालें तें झालें त्यास आतां उपाय नाहीं. पुष्पधन्व्यानें, आपल्या पित्यास राक्षसीदेह प्राप्त झाला व मीही त्यास स्त्रीच्या नादीं लागून व्यर्थ शाप दिला; म्हणून त्यास वाईट वाटलें. नेत्रांतून अश्रूंचे पाट वाहूं लागले. तो त्या निशाचररूपीं मदांधाच्या कमललोचनेसह पायां पडून ह्मणाला, मी अपराधी आहें, बोलूं नये तें बोललों ह्याची समर्थांनीं क्षमा करावी. मी आपणांस उःशाप हाच देतों कीं, विक्रमहस्तें तूं मरण पावून पूर्व स्वरूपास पात्र होशील. व त्याच करितां मीही आपल्या स्त्रीसहवर्तमान पुनर्जन्म घेतों. आपल्यास नरदेह कधींना कधींतरी प्राप्त होईलच यांत कांहीं संशय नाहीं, मग आतां ह्याच देहानें कमललोचनेस

भोगिली असतां कोण काय करणार आहे? इला धरण्यास कांहींतरी साधन केलें पाहिजे. इला काय तो पुष्पधन्व्याचाच आधार ना? त्यालाच भक्षण केल्यावर ती कुठें जाणार आहे. मदांधानें याप्रमाणें मनांत विचार करून एकदम त्या मठांत शिरला आणि कमललोचनेस ह्मणाला कीं, तुझें पातिव्रत्य मीच मिळविणार आणि मीच तुझ्यासमक्ष ह्या पुष्पधन्व्यास खाऊन टाकितों. मित्रहो, हा राक्षस ज्या वेळेस असा बोलला त्यावेळेस उभयतांस काय वाटलें असेल ह्याची कल्पना आपणच करा. मित्रहो, धुतलेलें पांघरूण जसें पिळतात तद्वत ह्या मदांधरूपी निशाचरानें पुष्पधन्व्याचें शिरकमल धरून त्यास पिळिता झाला!! पुष्पधन्वा गतप्राण झाला हें पाहून राक्षस कमललोचनेस म्हणाला, आतां तूं कुठें जाणार? कधीं ना कधीं तरी तुला यथेच्छ भोगीनच. असें ह्मणून पुष्पधन्व्याचा पिळा तेथेंच टाकून तो मदांध निशाचर अरण्यांत गमन करिता झाला. इकडे कमललोचनेच्या दुःखास तर पारावारच नाहींसा झाला. पतीचें प्रेत, मांस आणि हाडें ह्यांकडे पाहून बेशुद्ध होऊन तिनें फारच मोठ्यानें किंकाळी फोडली! पण उपयोग काय? कमललोचनेनें पतीचें प्रेत मांडीवर घेऊन असा कांहीं शोक केला कीं, सांगतां पुरवत नाहीं. ती ह्मणाली—प्राणनाथ, आतां मी आपणांवाचून काय करूं! मला कोण आहे? माझी सौभाग्यनौका ह्या दुष्टानें समुद्रांत बुडविली! कोठे हो स्वभावाचें, गुणाचें, व मंजुळ भाष·

णाचें वर्णन करूं. प्रिया, दासीकडून एखादा अपराध झाला असल्यास समर्थांनीं त्याची क्षमा करावी. अग आई! सख्या, इतकं रागावण्यास काय हो झालं! कोण काय तुम्हांस बोललं! आपल्या पित्याच्या चाहाड्या तुमच्याजवळ सांगितल्यामुळें तुम्ही त्यास शाप दिला ह्मणून मदांधास राग येऊन तुमचा व्यर्थ त्यांनीं माझ्यामुळं वध केला ह्मणून तर सख्या रागावलां नाहींतना? हर, हर! देवा, यांच्या वधास मीच चांडाळीण कारण झालें काय? अशी जी मी पापीण तर मीही आपला कशाला, कलंक लावून घेण्यास देह ठेऊं? प्राणनाथ, थांबाहो थांबा, मीही आपणाबरोबर येतेंच. असा विलाप करून कमललोचनेनें महदु:खेंकरून पतीचें प्रेत, अस्थी, मांस आदि आपल्या हस्तानें गोळा करून एका वनांस गमन केलें. पतीचें प्रेतादि तेथें ठेवून आपण काष्टें जमा करण्यास गेली. बरींच लांकडें वगैरे गोळा केल्यावर त्यास तिनें चेतविलें. ज्वाळाही प्रखर तेजावलंबित झाल्यावर ह्या सकुमारीनें आपल्या पतीचें प्रेत हातांत घेऊन डोळे मिटून अग्नीची स्तुती केली आणि तीन प्रदक्षिणा घालून आंत उडी टाकावी तों राक्षसरूपी मदांधानें तिला मागच्या मागें उचलून एकांतांत नेली. त्यावेळेस अमृतांत विष पडावें असें झालें: राक्षस मदांध म्हणतो, कमललोचने, तुला हवें तें देईन, मी पाहिजे असल्यास तुझें दास्यत्व करीन, परंतु एकदां मनकामना पूर्ण कर ह्मणजे झालें. आणखीं तुला हेंही

वाटत असेल कीं, एकदा काम झालें ह्मणजे कोणी विचारणार नाहीं तर हेंही तूं समजूं नको. जोंपर्यंत जिवांतजीव ह्मणून आहे तोंपर्यंत तुला अन्तर देणार नाहीं. **कमललोचनेस** तेवेळीं फारच वाईट वाटून तिला पोटापासून रडूं आलें, परंतु विचारी करते काय? जरी ती अबला इतक्या संकटांत व दुःखसमुद्रांत बुडाली होती तरी तिनें एक युक्ती योजून त्या **मदांध** राक्षसास म्हटलें कीं, मी आतां कुठेंही जाणार नाहीं, तुमच्या येथेंच राहीन, परंतु माझें अगत्यानें एवढें काम ऐकाल तर बरें होईल. राक्षसानें अत्यानंदेंकरून 'होय' म्हटलें. तिनें त्याला त्या विस्तवांतून थोडासा विस्तव घेऊन ये ह्मणून सांगितलें. सदहूप्रमाणें राक्षस विस्तू घेऊन परत आला तों त्या स्थलीं **कमललोचनेचें** प्रेत पडलें आहे! नंतर त्या राक्षसास अतीशय वाईट वाटलें, आणि त्वेषानें तिच्या पतीसह तिला अग्नी देऊन आपण वनामधें इकडे तिकडे भ्रमण करूं लागला; तों **विक्रमानें अवंतीस** जातांनां त्याचा वध केला हें बहुश्रुत झालेंच आहे." हीच गोष्ट त्या राक्षसानें मृत्युसमयीं **विक्रमास** सांगितली. **माधवास** राज्याभिषेक झाल्यानंतर तीच गोष्ट **विक्रमानें** सर्वांस सांगितली तीच मी सारांशरूपानें, मित्रहो, आपणांस श्रुत केली. **गोमाजीकापसे**, मृत्यु पावलेला स्त्रीपुरुषांचा जोडा तोच हा **कामसेन** व **रतिप्रिया** ह्या त्रिवर्गांचेंही देहांतर होऊन ईश्वरकृपेनें पूर्वस्थिती त्यांना मिळाली. असो. त्याच राक्षसानें **शृंगारवल्लरी**पुढचें

बालक घेऊन एका सडकेवर वृक्षाच्या डाहाळीस अडकवून ठेविलें. कर्मधर्मसंयोगें त्याच दिवशीं आपल्या **माधव** सरकारांचे मातापितरां त्यांनां ही सावकार लोकांनीं गांवांतून हाकून लाविलें आणि **शृंगारवल्लीस** उभयतांही मरण पावले ह्मणून गावच्याच लोकांनीं पत्र पाठविलें होतें. असो. त्याच रस्त्यानें **देवनगरीस** जात होते. चालून चालून थकल्यामुळें एका वृक्षाखालीं ते बसलेतों त्या झाडांतून त्यांस रुदन ऐकूं आलें, तें पाहून उभयतांसही मोठें नवल वाटलें आणि वर पाहूं लागलीं तों डाहाळीस टांगलेलें गोजीरवाणें पुत्ररत्न रडत आहे असें दिसलें. वृद्ध मातापित्यांनीं हें पहातांच त्यांस दया आली. प्रयत्नानें, बालकास दुःख होऊं न देतां, त्यांनीं त्यास खालीं काढलें आणि पहातात तों प्रति **माधवाची** मूर्ति ! मग त्यांचा आनंद किती ह्मणून वर्णन करावा !! परंतु त्यांना पुत्र स्नुषेची आठवण होतांच दुःखही झालें. **माधवा**बद्दल आपसांत तीं मातापितरें बोलत आहेत तों त्यांच्याकडे चौघे शिपाई येतांना त्यांच्या दृष्टीस पडले. शिपाई लोकांनी जवळ जाऊन त्यांस विचारिलें कीं, तुम्ही कोण आहां? तेव्हां त्यांनीं आपली साद्यंत हकीगत सांगितली. तें ऐकून शिपाई लोकांस मोठा हर्ष होऊन त्यांनीं ती वार्ता **माधवास** श्रुत केली. **माधवास**ही मोठें आश्चर्य वाटून आनंदही झाला. त्यांनीं [**माधवसरकारांनीं**] त्यांस मोठ्या समारंभानें नगरांत मिरवीत आणलें. ह्याप्रमाणें **माधव**

आतां तिघी स्त्रियांसह, बालकासह, व मातापित्यासह-वर्तमान सांप्रत सुखानें राज्य करूं लागले.

**गोमाजीकपसे**–[ त्यास शाबासकी देऊन ] अरे उडाणटप्पु, तुला रे इतकी माहिती कुठून झाली ?

**उडाणटप्पु**–[ हंसत ] अरे, आमचें भलें घेऊन पुसतां !! आमची स्त्री, शृंगारवल्लरी बाईसाहेबांची दासी आहे; ह्मणून मलाही साद्यंत हकीगत समजली.

**लिंगंभट**–नाहीं पण, तुम्ही आज खूपच कर्मणूक केलीत यांत कांहीं संशय नाहीं.

**अप्पलपोटे**–बरें तर, मला राजाकडे जाणें आहे करितां सर्वांचा हुकूम असावा.

**सर्व**–आम्हांसही कामें आहेतच पण !

**अप्पलपोटे**–चला, उठा तर आतां.

**सर्व**–तुझी आपल्यापोटावर काय ती सगळी दृष्ट. बरें चला आतां.

**अप्पलपोटे**–फार उत्तम आहे.

( नमस्कार वगैरे झाल्यावर सर्व आपापल्या घरीं गमन करतात. ]

[ पडदा पडतो. ]

**प्रवेश २ रा समाप्त.**

प्रवेश ३ रा.

—-—

स्थळ–देवनगरी, राजसभा.

पात्रें.

माधव................देवनगरीचा भूपती.
सुमती................प्रधान.
रामसींग ..............सेनापती.
सूत्रधार................नाटकाचार्य.
विदूषक..............त्याचा मित्र.

[ तदनंतर विदूषक खुर्चीवर बसून सूत्रधाराशीं संभाषण करूं लागतो.

विदूषक–वेल, डियर सूत्रधार, कालचे लाडू बुवा खूपच पोटांत बसले. आज इकडचें अंग तिकडे हालूं देत नाहींत.

सूत्रधार–मग इतके खाल्ले कशाला? बरं पण, तेंही असो, दक्षणा काय मिळाली?

विदूषक–एका शालजोडींतली एक मोहोर. बरें पण, आतां तुम्ही येथें दिग्विजय काय लावणार. लौकर सांगा. पण कांहीं, आज काल तीं तीन पांखरें दिसत नाहींत तीं कुठें आहेत बरें?.

सूत्रधार–सहस्त्र वर्षे जरी त्वां आतां तप केलेंस तरी तुला नखाग्रही दृष्टीस पडणार नाहीं.

**विदूषक**–इतक्या त्या पांजणी बेमान झाल्या काय, चिंता नाहीं.

( इतक्यांत **चोपदार** मोठयानें ललकारीत येतो त्याप्रमाणें सर्व सभा घनदाट बसली आहे तों **माधव** येऊन सिंहासन सुशोभित करतो ].

**माधव**–[ **सुमतीस** ] सचिवा, सांप्रत ममसुदैवेंकरून जें राज्य प्राप्त झालें आहे त्याचा आपण फारच उत्तम प्रकारें व कळकळीनें बंदोबस्त ठेवावा. मी आपणांस सांगावें असें नाहीं, परंतु राजधर्म आहे ह्मणून सांगतों.

**सुमती**–[ हात जोडून ] सरकार, आपल्या आशीर्वादेंकरून सर्व कांहीं यथासांग होईल. नुकतेंच बीं पेरलें आहे तर त्याचें झाड उगवून महाराजांचे दृष्टोत्पत्तीस येईलच.

**माधव**–[ **रामसींगास** ] सेनापती, मी आपले उपकार स्मरूनच आपणांस मी इतक्या पदवीस चढविलें आहे तरी तुह्मांस सांगणें ह्मणून इतकेंच कीं, ह्या पदवीचा व स्वराज्याचा अभिमान धरून सेनेचा बंदोबस्त फार दक्षतेने व उत्तम प्रकारें ठेवणें.

**रामसींग**–( हात जोडून ) सरकार, आतां तर मी कांहीं बोलून दाखवीत नाहीं. थोड्या दिवसांनी नजरेस येईलच.

**माधव**–सर्व सभासदहो, सर्व राज्याची व्यवस्था, वगैरे पहाणें पंचसभेप्रमाणें आपणांकडेच आहे. प्रजेस रतिभर सुद्धां दुःख नसून सेना इतकी तयार असली पाहिजे कीं, हं ह्मणतां सर्व तयारी. कारण परचक्र

केव्हां येईल आणि केव्हां नाहीं ह्याचा कांहीं भरंवसा नाहीं. म्हणून आपणांस वारंवार हीच विनंती करितों. ( इकडे तिकडे पाहून ) कोण आहेरे येथें, सेवक ?

**विदूषक**–( हात जोडून ) जी सरकार.

**माधव**–सर्व सभासदांस पानसुपारी दे. ( **सुमतीकडे** पाहून ) सचिवशार्दुला, आपण येवढ्या दोन तीन दिवसांत मी सांगतों, लोकोपयोगी कामाकरितां मंदिरें बांधवावीं. एक **गायनशाला**, **तंतुशाला**, **पंचसभा**, **न्यायसभा**, **देवालयें**, **धर्मशाला**, वाटसरूंकरितां **बावड्या**, याचकांकरितां **अन्नसत्र**, अशीं मंदिरें लौकरच बांधून सर्व राज्यांत **विद्येचा प्रसार** केला पाहिजे. प्रत्येक गावीं एक **मुलांची**, एक **मुलींची**, एक **गायकाची** व **तंतुवाद्याची** शाळा असून गरीबलोकांकरितां एक **अन्नछत्र**, **धर्मशाला**, बावडी वगैरे सर्व यथास्थित करून सर्व प्रजेस **आनंदसागरांत** बुडवा. सेनापते, तसेंच आपण सेनेबद्दलही सावध राहणें. मी कोणेवेळेस पाहण्यांस येईन ह्याचा नेम नाहीं. असो. प्रधानजी, **कामसेनाचा सुवर्णवसंतबाग** पहाण्याची इच्छा आहे तर दाखविण्यास आपण चलावें. आणखी,

भरतवाक्य.

[ वसंत तीलका. ]

**होवो अतां मम सुराष्ट्रीं पर्जन्यवृष्टी ॥**
**राहो सुखांत परमेश्वर जन्य तुष्टी ॥**

त्याच्या सुपायिं असणें मति लीनतेनें ॥
राहो कवी सहित शंकर हर्षतेनें ॥१॥

[ सर्व गमन करतात. )

( पडदा पडतो )

प्रवेश ३ रा समाप्त.

श्री कृष्णार्पणमस्तु.

---



## विशेष सूचना.

———ooo———

हा ग्रंथ छापत असतां रा. रा. शंकर राव देशपांडे यांनीं योग्य साह्य केलें ह्मणून ग्रंथकर्ता फार आभारि आहे.

ग्रंथकर्ता.

## ह्या पुस्तकास ज्या उदार गृहस्थांनीं आश्रय दिला त्यांचीं नांवें.

———ooo———

| नांवें. | प्रती. |
|---|---|
| **अ** | |
| रा. रा. अनंत चिंतामण फडके... | १ |
| ,, ,, अनंत सखाराम .......... | १ |
| ,, ,, अनंत रघुनाथ भिरंगीकर... | १ |
| ,, ,, अंताजी गोविंद सामंत...... | १ |
| ,, ,, अंताजी महादेव... ... .. | १ |
| ,, ,, अमृत रावजी रिलिव्हिंगक्लार्क | १ |
| **क** | |
| रा. रा. कृष्णराव रघुनाथ ओक...... | १ |
| ,, ,, कृष्णराव रघुनाथ, बी०...... | १ |
| ,, ,, कृष्णा बळवंत... .. .. .. | १ |
| ,, ,, कृष्णाजी विष्णु गोसावी..... | १ |
| ,, ,, कृष्णाजी विष्टो विलगीकर... | १ |
| ,, ,, कृष्णाजी महादेव .. .. .. | १ |
| ,, ,, कृष्णाजी रामचंद्र मोजणीदार | १ |
| ,, ,, कृष्णाजी नरसींह मोजणीदार | १ |
| ,, ,, कृष्णाजी धोंडोजी .. .. | १ |
| ,, ,, कृष्णाजी गणेश. .. .. .. | १ |
| ,, ,, काशीनाथ नथ्थोबा इन्स्पेक्टर | १ |
| ,, ,, केशव गंगाधर सोनी .. .. | १ |
| ,, ,, केशव लक्ष्मण मास्तर. .. | १ |

रा. रा. केशव गोविंद फाटे .. .. १
,, ,, केशव रामचंद्र .. .. .. १
,, ,, केशव रामचंद्र .. .. .. १
,, ,, केशव नारायण .. .. .. १
,, ,, केशव दिनकर केतकर .. १

ग

श्री. रा. गोविंदराव कृष्ण भुसकुटे. ५
रा. रा. गोविंद लक्ष्मण कवठेकर. १
,, ,, गणपत बाघोजी म्हावसीकर १
,, ,, गणेश वैजनाथ .. .. .. १
,, ,, गणेश महादेव .. .. .. १
,, ,, गणेश रघुनाथ पटवर्धन .. १
,, ,, गणेश नारायण .. .. .. १
,, ,, गोपाल लक्ष्मण श्रीखंडे .. १
,, ,, गोपाळ गणेश .. .. .. १
,, ,, गोपाळ वामन .. .. .. १
,, ,, गोपाळ भगवंत .. .. .. १
,, ,, गोपाळ रामचंद्र .. .. .. १
,, ,, गोपाळ रामचंद्र... ... ...१
,, ,, गोपाळ कृष्ण घिसड...... १
,, ,, गोविंद अनंत ... .... ....१
,, ,, गोविंद नारायण ... .... १
,, ,, गोविंद शिवराम.... .... १
,, ,, गोविंद रामचंद्र लोकोळीकर १
,, ,, गोपाळ गंगाधर पाठक..... २

ज

रा. रा. जगन्नाथ कृष्णाजी उपासिनी १
,, ,, जगन्नाथ विनायक.... .... १
,, ,, जयराम बापुजी सोलव ..... १

त

रा. रा. त्रिविक्रम रामकृष्ण आठल्ये १
,, ,, त्रिंबक विष्णू दातार... ... १

द

रा. रा. दामोधर एकनाथ... ... ...१
,, ,, दामोधर गणेश भांडारे...... १
,, ,, दिवाकर बाळकृष्ण हे. मा. १
,, ,, दुर्गाजी महादेव... ... ...१
मि. देवी प्रसाद .. .. .. .. १

ध

रा. रा. धुंडीराज हरी ... .. .. १

न

रा. रा. नाना सितु पाटील.. .... १
,, ,, नारायण गणेश.... .... १
,, ,, नारायणराव गोविंदराव.... १
,, ,, नारायण अन्नाजी.... ... १
,, ,, नागेश रोत्तम .. .. .. १
,, नीलकंठ पुरुषोत्तम रेंगे ठा.हा.स्कु. १

प

रा.रा. पंढरीनाथ नारायण जोशी कुळक. १
,, ,, परशराम गंगाधर साठे..... १

| | | | |
|---|---|---|---|
| मि. | | परमानंद ( सिम्लर ) ... | १ |
| रा. ब. | | पांडुरंग दाजी अधिकारी ... | १ |
| ,, | ,, | पांडुरंग विश्वनाथ... ... | १ |
| ,, | ,, | पांडुरंग गणेश... ... ... | १ |

ब

| | | | |
|---|---|---|---|
| रा. | रा. | बळवंत अबाजी... ... .. | १ |
| ,, | ,, | बळवंत कृष्ण... ... ... | १ |
| ,, | ,, | बळवंत व्यंकटेश.. ... ... | १ |
| ,, | ,, | बळवंत रघुनाथ... ... ... | १ |
| ,, | ,, | बळवंत गणेश... ... ... | १ |
| ,, | ,, | बळवंत गणेश... ... ... | १ |
| ,, | ,, | बळवंतराव आर. पी. ... ... | १ |
| ,, | ,, | बापु विनायक चापेकर ... | १ |
| ,, | ,, | बाबा शास्त्री ... ... ... | १ |
| ,, | ,, | बाळकृष्ण मोरेश्वर... ... | १ |
| ,, | ,, | बाळाजी रघुनाथ ... ... | १ |
| ,, | ,, | बापु सिताराम ... ... ... | १ |
| ,, | ,, | बाजी गणेश ... ... ... | १ |
| ,, | ,, | बाळाजी गोपाळ... ... ... | १ |
| ,, | ,, | बाळकृष्ण गंगाधर चंद्रात्रे | १ |
| ,, | ,, | बाळाजी भवाजी ... ... | १ |
| ,, | ,, | बाबू नीलकंठ... ... ... | १ |

भ

| | | | |
|---|---|---|---|
| रा. | रा. | भास्कर काशिनाथ... ... | १ |
| ,, | ,, | भाऊसाहेब पोहणकर ... ... | १ |

रा. रा. भावडू वल्लद धोंडू ... ... १
,, ,, भाई० गणपतराव पाटील ... १
,, ,, भालचंद्र वामन ... ... ... ४
,, ,, भिकाजी धोंडदेव ... ... १

म

रा. रा. मन्नेलाल चोबे ज्योतिषी ... १
मि. महंमद सादीन ... ... ... १
रा. रा. मार्तंड नारायण ... ... ... १
,, ,, माधव अनंत परांजपे ... ... १
,, ,, माधव रामचंद्र ... ... ... १
,, ,, माधव बाळकृष्ण ... ... ... १
,, ,, माधव हरी एस्० ... ... ... १
,, ,, माधवराव हिराजी शहाणे ... १
,, ,, मुकुंदराव पावणसकई
इन्स्पेक्टर ... ... ... ... १६
,, ,, मुकुंद रामचंद्र ... ... ... १
,, ,, मोरेश्वर नानाभाई कोठारे १

य

रा. रा. यादव विश्वनाथ ... ... ... १

र

रा. रा. रामचंद्र श्रीपत ... ... ... १
,, ,, रामकृष्ण श्रीधर बेलापुरकर १
श्री. रा. रघुनाथराव राजेसाहेब ... ... १
रा. रा. रघुनाथ कृष्ण ... ... ... १
,, ,, रघुनाथ शिवराम ... ... ... १